**राज्यातील नागपूर,चंद्रपूर, गोंदिया,अकोला, नांदेड व जळगाव या जिल्ह्यात/ महानगरपालिका क्षेत्राकरीता उष्मा कृती आराखडा (Heat Action Plan) अंमलबजावणी करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः उष्माघा २०१५/प्र.क्र.२२३/आ-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: १९ ऑक्टोंबर, २०१५

**प्रस्तावना** -

पृथ्वीवरील बदलत्या वातावरणामुळे उष्ण तापमानात वाढ होते आणि उष्माघात होतो. राज्यातील नागपूर, चंद्रपूर, गोंदिया, अकोला, नांदेड व जळगाव या सारख्या जिल्ह्यात/ महानगरपालिका क्षेत्रात बदलत्या वातावरनामुळे, उष्णतेच्या लहरीमुळे उष्णतेची नोंद ४५ डीग्री सेलसियस पेक्षा अधिक होते. याबाबत केलेल्या संशोधनावरुन उष्णतेच्या लहरीमुळे आजार आणि मृत्यू दरात वाढ होत असल्याचे दिसून येते. गुजरात मधील अहमदाबाद शहरामध्ये मागील तीन वर्षापासून उष्माघात कृती आराखड्याची (Heat Action Plan) अंमलबजावणी करण्यात येते आणि त्यामुळे उष्णतेच्या लहरीमुळे होणाऱ्या मृत्यू संख्येत घट झाल्याचे दिसून येते. महाराष्ट्र राज्यातील नागपूर, चंद्रपूर, गोंदिया, अकोला, नांदेड व जळगाव या जिल्ह्यात महानगर पालिका क्षेत्रात उष्माघात कृती आराखडा तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

महाराष्ट्र राज्यात नागपूर, चंद्रपूर, गोंदिया, अकोला, नांदेड व जळगाव या जिल्ह्यात/ महानगरपालिका क्षेत्रात उष्माघात कृती आराखड्याची अंमलबजावणी करण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

उष्माघात कृती आराखडयाची प्रभावीपणे अंमलबजावणी खालील मार्गदर्शक सुचानांनुसार करण्यात यावी.

१. नागपूर, चंद्रपूर, गोंदिया, अकोला, नांदेड व जळगाव या प्रत्येक जिल्ह्यात/ महानगरपालिका क्षेत्रात आयुक्त/जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली व्यापक अशी समन्वय समिती गठीत करण्यात यावी.
२. वरील प्रत्येक जिल्ह्यात/महानगरपालिका क्षेत्रात नोडल अधिकाऱ्याची नियुक्ती करावी.

३. समन्वय समितीमध्ये परिस्थितीनुसार संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, ट्राफिक पोलीस, जिल्हा शल्य चिकित्सक, कार्यकारी अभियंता (सार्वजनिक आरोग्य विभाग) तळागाळात काम करणाऱ्या स्वयेसेवी संस्थाचे प्रतिनिधीचा समावेश करण्यात यावा.
४. संदेश/पत्रके/जिंगल्स इ.व्दारे प्रसिध्दी माध्यमे/ टि.व्ही चेनेल यांच्या सहभागातून जनजागृती करण्याबाबत संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा शल्य चिकित्सक/वैद्यकीय आरोग्य आधिकारी यांनी कार्यवाही करावी.
५. उष्माघात कृती आराखड्याच्या अंमलबजावणीसाठी आवश्यक असलेल्या निधी बाबतची तरतूद संबंधित जिल्हाधिकारी/आयुक्त महानगरपालिका यांनी करावी.
६. उष्माघाताच्यावेळी नागरिकांना उपाय योजना मिळण्याकरीता आपत्कालीन दूरध्वनी क्रमांक/ वेब साईट तयार करावी/ सुरु करावी.
७. उष्णतेने बाधीत रुग्णांकरीता १०८ नंबरवर ॲम्युलन्सची सुविधा उपलब्ध करावी.
८. उष्माघाताने बाधित रुग्ण ओळखून त्यांचेवर तातडीने इलाज करण्याचे दृष्टीने विविध स्तरावरील आरोग्य सेवकोचे प्रशिक्षण आयोजित करावे.
९. उष्माघातामुळे होणारे मृत्यू, बाधित रुग्ण इत्यादींचे सनियंत्रण करावे.
१०. उष्माघाताची परिस्थिती ओळखणे, जवळच्या शासकीय रुग्णालयात जाण्यासाठी संदर्भसेवा देणे याकरीता आशा वर्कर/ लिंक वर्कर यांना प्रशिक्षित करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०८१८०७४९५६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Hanumant Karanjekar

Digitally signed by Sanjay Hanumant Karanjekar
DN: CN = Sanjay Hanumant Karanjekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.10.19 17:44:23 +05'30'

**(सं.ह.करंजेकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. जिल्हाधिकारी- नागपूर, चंद्रपूर, गोंदिया, अकोला, नांदेड व जळगाव.

५. आयुक्त महानगरपालिका - नागपूर, चंद्रपूर, अकोला, नांदेड व जळगाव.

६. विभागीय आयुक्त नागपूर, अमरावती, नाशिक व औरंगाबाद.

७. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

८. उप संचालक (प्रशिक्षण) तथा प्राचार्य सार्वजनिक आरोग्य संस्था, नागपूर.

९. उप संचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.

१०.उप संचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.

११.उप संचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.

१२.उप संचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.

१३.जिल्हा शल्य चिकित्सक - नागपूर, चंद्रपूर, गोंदिया, अकोला, नांदेड व जळगाव.

१४.वैद्यकीय आरोग्य अधिकारी - नागपूर, चंद्रपूर, गोंदिया, अकोला, नांदेड व जळगाव.

१५.सह संचालक, आरोग्य सेवा (हि.ह. व ज.रो.), पुणे.